**A.A. to Special Repairs of Right Bank Canal from ch 7500 to 15000 m. of Mahasangavi Medium Project (TL. Patoda Dist. Beed)**

**महासांगवी मध्यम प्रकल्पाच्या (ता.पाटोदा, जि.बीड) उजव्या तीर कालव्याच्या सा.क्र.७५०० ते १५००० मी. मधील विशेष दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र.दुरुस्ती २०११/(६८३/२०११)/सिंव्य(कामे)
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : २७/४/२०११**

**पहावे :** १) गोदावरी-मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. गोमपाविम/तां/१/सिंव्य/७४८४, दि. २/९/२०१० चे पत्र.
२) गोदावरी-मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जाक्र/लाक्षेवि/जसंविः/तां/२/धा-२९३/१५९/०९, दि. १०/१/२०११ चे पत्र.

**प्रस्तावना :**

महासांगवी मध्यम प्रकल्प हा मांजरा नदीवर सन १९६५ मध्ये बांधण्यात आलेला आहे. या प्रकल्पाची प्रकल्पीय एकूण पाणी साठवण क्षमता ६.७४ दलघमी इतकी असून प्रकल्पीय उपयुक्त पाणीसाठा ५.८८८ दलघमी इतका आहे. प्रकल्पाचे एकूण सिंचन क्षेत्र १९४३ हे. एवढे असून प्रकल्पाचा मुख्य कालवा व वितरिका मिळूण वितरण व्यवस्थेची एकूण लांबी ३० किमी इतकी आहे. उजव्या कालव्याची लांबी २५ किमी आहे.

महासांगवी प्रकल्पाचे उजवा तीर कालवा सा.क्र.० ते ७.५ किमी मध्ये एक पाणी वापर संस्था आहे. या संस्थेच्या कार्यक्षेत्रातील हस्तांतरपूर्व दुरुस्तीची कामे मराठवाडा विकास कार्यक्रमांतर्गत प्रगतीपथावर आहेत. सा.क्र. ७.५० ते १५.०० किमी मध्ये परमेश्वर पाणी वापर सहकारी संस्था मर्या. नफारवाडा ता.बीड ही संस्था स्थापन झाली असून सदर क्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतर करण्यापूर्वी दुरुस्तीची कामे करणे आवश्यक आहे. धरणामध्ये ४५ वर्षात साठलेल्या गाळामुळे वर्षात १.०८ दलघमी एवढा जीवंत पाणीसाठा कमी झालेला आहे. उपरोक्त साठयात झालेल्या घटीमुळे एकूण १०४९ हे. क्षेत्र कपात झाले असल्याने किमी १५ ते २५ मधील कालव्याची कामे करणे व्यवहार्य नाही.

सध्या प्रस्तावित असलेल्या पाणी वापर संस्थेच्या कार्यक्षेत्रात (किमी ७.५० ते १५) ५३१ हे. एवढे लाभक्षेत्र येते. सध्या या कार्यक्षेत्रातील वितरण व्यवस्था नादुरुस्त झाल्यामुळे व त्यावरील बांधकामे क्षतिग्रस्त

झाल्याने कालव्यातून गळती होते. त्यामुळे योग्य विसर्ग निर्गमित होत नाही. अशा परिस्थितीत कालव्याची दुरुस्ती, बांधकामाची दुरुस्ती, पुनर्स्थापना करणे आवश्यक आहे. या बाबींचा विचार करुन महासांगवी मध्यम प्रकल्पाच्या सा.क्र.७५०० ते १५००० मी. मधील स्थापीत परमेश्वर पाणी वापर सहकारी संस्था मर्या. नफारवाडी, ता.पाटोदा.जि.बीड च्या कार्यक्षेत्रातील हस्तांतरपूर्व विशेष दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

## **शासन निर्णय :**

या शासन निर्णयाद्वारे महासांगवी मध्यम प्रकल्पाच्या सा.क्र.७.५० ते १५.०० कि.मी. मधील हस्तांतरपूर्व विशेष दुरुस्ती कामास रु. ५५.१६ लक्ष (रु.पंचावन्न लक्ष सोळा हजार मात्र) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१) सदर प्रकल्पास महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ लागू करावा व त्यातील कलम ६ नुसार प्रकल्प अधिसूचीत करण्यात यावा. अशी अधिसूचना काढल्यानंतरच प्रस्तावित दुरुस्तीची कामे हाती घेण्यात यावीत.

२) शासन निर्णय क्र. मजसुप्र १००६/(६८८/०६)/लाक्षेवि(कामे), दिनांक १४ जून २००७ अन्वये लघु वितरिकास्तरीय पाणी वापर संस्थेच्या कार्यक्षेत्रातील हस्तांतरपूर्व/विशेष दुरुस्तीची कामे कंत्राट व्यवस्थापन समिती स्थापन झाल्यानंतरच हाती घेण्यात यावीत.

३) मुख्य कालव्याच्या एकूण लांबीपैकी ५ टक्के लांबीमध्ये अस्तरीकरण कालव्याच्या प्रत्यक्ष परिस्थितीनुसार करण्यात यावी.

४) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

या कामावर होणारा खर्च ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (विस्तार व सुधारणा/विशेष दुरुस्ती) ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील इतर उपक्रमातील गुंतवणुका, १० विस्तार व सुधारणा कार्यक्रमांतर्गत मराठवाडा विभागास भागभांडवली अंशदान (योजनांतर्गत) (१०)(०२)गो.म.पा.वि.महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ ते १४९) या लेखाशीर्षाखाली खर्च टाकावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली मूळ प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.१ सन २०११-१२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १००६/प्रक्र ८२/०६/विनिमय, दिनांक १३/३/२००७ नुसार

विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर(www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०११०४२७१५२०३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत : परिशिष्ट

**( पां. तु. .केदारे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी-मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाक्षेविप्रा, औरंगाबाद
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता व प्रशासक लाक्षेविप्रा, बीड
अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्र.दुरुस्ती २०११/(६८३/२०११)/सिंव्य(कामे), दिनांक २७/४/२०११ चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| **अ.क्र.** | **शीर्ष/उपशीर्ष** | **अंदाजित किंमत (रु.लक्ष)** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | II मुख्य कालवा व शाखा कालवा | ४९.०१ |
| २ | III वितरिका | ६.१५ |
| ३ | कामाप्रित्यर्थ एकूण खर्च | ५५.१६ |